राज्य योजना सन २०१८-१९
डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) निधी वितरीत करणे.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०६.१८/प्र.क्र.२३०/फ-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २९ ऑगस्ट, २०१८.

वाचा :-

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०६.१८/प्र क्र २३०/फ-१, दि२.०६.२०१८.
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०६.१८/प्र क्र २३०/फ-१, दिनांक :- २०.०६.२०१८.
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०६.१८/प्र क्र २३०/फ-१, दिनांक :- २६.०६.२०१८.
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०६.१८/प्र क्र २३०/फ-१, दिनांक :- २६.०७.२०१८.
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०६.१८/प्र क्र २३०/फ-१, दिनांक :- ०४.०८.२०१८
७. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०६.१८/प्र क्र २३०/फ-१, दिनांक :- २०.०८.२०१८
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/इए/यो/प्र.क्र.०२/१८-१९/८८६, दिनांक :- २०.०८.२०१८.

प्रस्तावना :-

सन २०१८-१९ राज्यस्तरीय योजनेअंतर्गत डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) या लेखाशिर्षांतर्गत रुपये १०,०००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. संदर्भ क्रमांक २, ३, ४, ५, ६ व ७ च्या शासन निर्णयान्वये डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) या योजनेअंतर्गत एकूण **रु.६३७५.९२ लक्ष निधी** वितरित करण्यात आला आहे. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ८ च्या पत्रान्वये सन २०१८-१९ करीता डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) या लेखाशिर्षांतर्गत **रु. ९५०.०० लक्षचा** प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

शासन निर्णय : -

वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ च्या परिपत्रकानुसार प्रशासकीय विभागास निधी वितरणाबाबत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये आतापर्यत वितरीत केला व वितरणासाठी शिल्लक असलेला निधी लक्षात क्षेत्रा अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ८ च्या पत्रान्वये डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-

वन विकास योजना (२४०६-८७११) या योजनेंतर्गत सादर केलेल्या प्रस्तावापैकी बम्हपूरी वन विभागाअंतर्गत नविन गांवाकरीता खालील अटींच्या अधीन राहून **रुपये ६२४.०८** लक्ष निधी खर्च करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१८-१९ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२, पर्यावरणीय वनिकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे संरक्षण, (००) (१८) डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११)अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

२. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

३. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

४. सदरच्या खर्चाच्या अनुषंगाने आवश्यक असलेले लेखे व्यवस्थित/अचूक ठेवण्याबाबत दक्षता घ्यावी.

५. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

६. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक - १७.०४.२०१५ व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.४.२०१८ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

७. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक -०५.१५/ प्र क्र १५५/फ-१, दिनांक ४/०८/२०१५ व दिनांक १७.०७.२०१७, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५१७/ प्र.क्र.९७/फ-१ दिनांक २१.०३.२०१८ आणि शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०४१७/ प्र.क्र.१२७/फ-१ दिनांक २१ सप्टेंबर, २०१७ च्या अटींचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२९१७१७५३४६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2018.08.29 17:19:37 +05'30'

**( स्वप्निल देशभ्रतार )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर.
५. मुख्य वनंसरक्षक (प्रादेशिक)चंद्रपूर.
६. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
७. फ-१/२ ,ब कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

********